निलंबन रद्द करुन शासन सेवेत पुन:स्थापित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
शासन आदेश क्र.पसंप्र-२०१५/प्र.क्र.४१/पदुम-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- १० नोव्हेंबर, २०१६

**शासन आदेश :-**

पशुसंवर्धन विभागातील डॉ. परमानंद मिठुराव बागडे, तत्कालीन जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त,धुळे (निलंबित) यांचे विरुध्द लाचेचा सापळा प्रकरणी गु.र.नं.क्र.३०२९/२०१५ लाचलुचपत प्रतिबंधक कायदा १९८८ मधील कलम-७, १३(१)(ड) सह (१३)(२) अन्वये दि. २०.५.२०१५ रोजी आझादनगर पोलीस स्टेशन, धुळे येथे गुन्हा नोंदविण्यात येऊन त्यांना अटक करण्यात आली. डॉ.बागडे यांना दि. २३.०६.२०१५ च्या आदेशान्वये अटकेच्या दिनांकापासून निलंबीत करण्यात आले होते. डॉ.बागडे , यांच्या निलंबनास एक वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला असून सदर प्रकरणी त्यांचे विरुध्द न्यायालयात अभियोग दाखल करण्यात आला आहे व विभागीय चौकशी आदेशित करण्यात आली आहे. डॉ.बागडे , यांचा निलंबन कालावधी लक्षात घेऊन त्यांच्या विरुध्द प्रलंबित न्यायालयीन व विभागीय चौकशी प्रकरणी अंतिम निर्णयाच्या अधिन राहून डॉ.बागडे, निलंबन रद्द करुन त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे. तसेच पुन:स्थापनेनंतर डॉ.बागडे यांची पदस्थापना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदावर करण्यात येत आहे.

| अक्र. | अधिकाऱ्यांचे नांव | निलंबनापूर्वीचे पदस्थापनेचे ठिकाण | नविन पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | डॉ. परमानंद मिठुराव बागडे, | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त,धुळे,जि.धुळे | उपायुक्त पसं, (चाचणी व गुणनियंत्रण) पशुवैद्यकीय जैवपदार्थ निर्मिती संस्था, पुणे.(रिक्त पदावर) |

२. संबंधित अधिकारी यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. रुजू झाल्यानंतर रुजू अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११०१६०३५९१७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11a06bf85893554ac5cded657c0f1435af29a0ad118fb759493176e40002b178, cn=Shashank Madhav Sathe
Date: 2016.11.10 16:06:25 +05'30'

(श. मा. साठे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत ,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,औंध,पुणे.
२. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त,नाशिक
३. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुवैद्यकीय जैव पदार्थ निर्मिती संस्था,पुणे.
४. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, धुळे/पुणे
५. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, धुळे/पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी,धुळे/पुणे
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, धुळे/पुणे
८. संबंधित अधिकारी, (द्वारा आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे)/ निवड नस्ती.